शालेय क्रीडा स्पर्धा, खेलो इंडीया स्पर्धा व इतर क्रीडा स्पर्धा याकरिता आवश्यक निधी पुनर्विनियोजनाद्वारे उपलब्ध करुन देणेबाबत-(लेखाशिर्ष क्र. २२०४-५६३५)

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पुमाप्र-३४२३ /प्र.क्र.१६१ /क्रीयुसे-१,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ३१ मार्च, २०२४

**वाचा :-**

१. शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र. क्रीस्पर्धा-२०२३/प्र.क्र.७०/क्रीयुसे-२, दि.१२/०६/२०२३
२. शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र.क्रीस्पर्धा-२०२३/प्र.क्र.१५१/क्रीयुसे-२, दि.०२/११/२०२३
३. शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र. क्रीस्पर्धा-२०२३/प्र.क्र.१५१/क्रीयुसे-२, दि.२६/१२/२०२३
४. शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र. क्रीस्पर्धा-२०२३/प्र.क्र.७० (भाग-२)/क्रीयुसे-२, दि.२/१/२०२४
५. शासन निर्णय , शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र. केआयपी-१९२४/प्र.क्र.१४/क्रीयुसे-१, दि.१४/०२/२०२४
६. शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र. पुमाप्र-३४२३/प्र.क्र१६१/क्रीयुसे-१, दि.२१/०२/२०२४
७. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांचे पत्र क्र.क्रीयुसे/६ वी खेइंयुगे/निधी/२०२३-२४/का-४, दि.१०/०२/२०२४
८. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांचे पत्र क्र.क्रीयुसे/शाक्रीस्प/नि.वि/ २०२३-२४/का-४/५९०४, दिनांक दि.१८/०३/२०२४.
९. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांचे पत्र क्र.क्रीयुसे/६ वी खेइंयुगे/निधी/२०२३-२४/का-४/५९३८, दि.१९/३/२०२४
१०. शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र. पुनर्वि-२८२३/प्र.क्र.१०२/अर्थसंकल्प,३१/३/२०२४

**प्रस्तावना :-**

खेलो इंडिया - क्रीडा विकासासाठी राष्ट्रीय कार्यक्रम” ही केंद्र पुरस्कृत योजना शासन निर्णय, दिनांक २०.११.२०१८ अन्वये राज्यात लागू करण्यात आलेली आहे. सदर योजनेनुसार, देशातील युवा खेळाडूंकरिता खेळांच्या वार्षिक स्पर्धांचे आयोजन करण्यात येते. तसेच भारतीय शालेय खेळ महासंघ पुरस्कृत तालुका, जिल्हा, विभाग, राज्य व राष्ट्रीय स्पर्धांचे आयोजन व राष्ट्रीय स्पर्धेमध्ये राज्याचे संघ सहभागी करण्यासाठी आवश्यक निधी लेखाशिर्ष २२०४-५६३५ अंतर्गत उपलब्ध करुन देण्यात येतो. सन २०२३-२४ या आर्थिक वर्षासाठी सदर लेखाशिर्षाखाली अर्थसंकल्पीय अंदाजानुसार रु.२५००.०० लक्ष इतकी तरतूद आणि पुरवणी मागणीद्वारे रु. ६५७.०० लक्ष इतकी तरतूद असे एकुण रु. ३१५७.००

लक्ष इतकी तरतूद करण्यात आली आहे. सदर तरतूदीमधून रु. २३१६.०८४ लक्ष इतका निधी संदर्भ क्र.१ ते ६ येथील शासन निर्णयान्वये आतापर्यंत वितरीत करण्यात आला आहे. दरम्यान, शालेय क्रीडा स्पर्धा, खेलो इंडीया स्पर्धा व इतर स्पर्धांकरिता आवश्यक निधी उपलब्ध करण्याची मागणी आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांनी संदर्भ क्र.७ ते ९ येथील पत्रांन्वये केली आहे. यानुषंगाने सदर लेखाशिर्ष क्र.२२०४-५६३५ अंतर्गत यापुर्वी वितरीत निधी विचारात घेऊन अवितरीत निधी रू. ८,४०,९१,५५०/- व संदर्भ क्र. १० अन्वये पुनर्विनियोजनाने उपलब्ध झालेला रू. ३,४५,७५,९५०/- निधी असा एकत्रितपणे रू.११,८६,६७,५००/- इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

सन २०२३-२४ या आर्थिक वर्षासाठी लेखाशिर्ष २२०४-५६३५, शालेय क्रीडा स्पर्धांचे आयोजन, (३१), सहायक अनुदाने (वेतनेतर) याअंतर्गत यापुर्वी वितरीत निधी विचारात घेऊन उर्वरित निधी व संदर्भ क्र.८ अन्वये पुनर्विनियोजनाने उपलब्ध निधी असा एकत्रितपणे रू.११,८६,६७,५००/- (रू. अकरा कोटी, शहाऐंशी लक्ष सदुसष्ठ हजार, पाचशे फक्त ) इतका निधी खाली परिशिष्ट-अ मध्ये नमूद केल्याप्रमाणे वितरीत करण्यास याव्दारे मान्यता देण्यात येत आहे.

**परिशिष्ट-अ**

| अ. क्र. | बाब | निधी (लक्षमध्ये) |
|---|---|---|
| १ | सन २०२२ मधील ४ थ्या खेलो इंडीया युवा क्रीडा स्पर्धा, पंचकुला, हरीयाना येथील स्पर्धेतील पदक विजेत्यांना रोख रक्कमेची पारितोषिके अदा करण्यासाठी | रु.९७.१० |
| २ | सन २०२४ मधील ६ व्या खेलो इंडीया युवा क्रीडा स्पर्धा, तामीळनाडू येथील स्पर्धेतील पदक विजेत्यांना रोख रक्कमेची पारितोषिके अदा करण्यासाठी | रू.१०१८.०० |
| ३ | डिसेंबर २०२३ मधील १ ल्या खेलो इंडीया पॅरा गेम्स, दिल्ली- या स्पर्धेत राज्यातील खेळाडूंचा सहभाग व इतर अनुषंगिक बाबींकरीता | रु.३६.५७५ |
| ४ | सन २०२३-२४ मधील राष्ट्रीय शालेय क्रीडा स्पर्धेत सहभागी खेळाडूंना क्रीडा गणवेश (ट्रॅकसूट टिशर्ट व शॉर्ट) - देयके अदा करण्यासाठी | रू.३५.०० |
| | एकूण | ११८६.६७५ |

२. वरील परिशिष्ट-अ मध्ये नमूद अ.क्र. १,२,३ व ४ नुसार मागणी क्र.ई-३, मुख्य लेखाशिर्ष २२०४ क्रीडा व युवक सेवा, १०४, क्रीडा व खेळ (०५) (०६) शालेय क्रीडा स्पर्धांचे आयोजन (कार्यक्रम), (२२०४-५६३५), ३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेतर), या लेखाशिर्षातंर्गत अवितरीत रु. ८,४०,९१,५५०/- इतका निधी तसेच **लेखाशिर्ष** २२०४- ५३६८ (ऑलम्पिक अभियान) (कार्यक्रम) ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षातून संदर्भ क्र.१० येथील शासन निर्णयान्वये पूनर्विनियोजनद्वारे मंजूर केलेला रु ३,४५,७५,९५०/-इतका निधी याप्रमाणे एकूण

रु.११,८६,६७,५००/- इतका निधी आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना खालील अटी शर्तींच्या अधीन राहून वितरीत करण्यास याद्वारे मंजूरी देण्यात येत आहे.

I. उपरोक्त निधी आवश्यकतेनुसार व मान्य निकषांनुसार खर्च करण्यात यावा. शासन लेख्याबाहेरील बँक खात्यात हा निधी ठेवण्यात येऊ नये.

II. राज्य शासनामार्फत वेळोवेळी निर्गमित केलेली वित्तविषयक विविध परिपत्रके/ आदेश/नियम/ शासन निर्णय व वित्तीय नियमावली यांची काटेकोरपणे अंमलबजावणी करुनच वितरीत निधीचा विनियोग करण्यात यावा.

III. सदरचा निधी ज्या प्रयोजनाकरिता / बाबींकरिता मंजूर केला आहे, त्याच बाबींसाठी खर्च करण्यात यावा. खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र विहित वेळेत सादर करावे.

३. वित्त विभागाच्या दिनांक १२.४.२०२३ आणि दि.४.३.२०२४ च्या परिपत्रकांतील सूचनांनुसार उपरोक्त वितरीत तरतुद खर्च करण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी. यासाठी लेखाधिकारी, क्रीडा व युवक सेवा यांना आंहरण व संवितरण अधिकारी व आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय, नियोजन विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र. १८१ /१४७१, दि.२२.३.२०२४ व वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र. ४७४/व्यय-५, दिनांक २८.०३.२०२ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३३११५१०४००२२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RANSING ANANDRAO DERE

Digitally signed by RANSING ANANDRAO DERE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=9651a3c25d5e1f106e47059f72760ff520f9b00f67c3e9186e40ed4bd4fbaee6, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=41EC78BC14804BABDC24C7FD31BA9FBF63804F499D4335774E27423E40136397, cn=RANSING ANANDRAO DERE
Date: 2024.03.31 15:26:45 +05'30'

**( रणसिंग डेरे )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन,मुंबई.

२) मा.सभापती,महाराष्ट्र विधानपरिषद,यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.

३) मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा,यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
४) मा.विरोधी पक्षनेता,विधानसभा / विधानपरिषद, यांचे स्वीय सहायक, मुंबई
५) सर्व मा.विधानपरिषद/ विधानसभा सदस्य, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई
६) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
७) मा.उपमुख्यमंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव,
८) मा.उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव,
९) मा.मंत्री (क्रीडा व युवक कल्याण) यांचे खाजगी सचिव,
१०) मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक,
११) अपर मुख्य सचिव (वित्त/क्रीडा-अ.का) यांचे स्वीय सहाय्यक,
१२) महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता /लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ -नागपूर.
१३) उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा, पुणे(क्रीडा संचालनायामार्फत )
१४) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे ),क्रीडा संचालनायामार्फत(
१५) वित्त विभाग का.व्यय-५/का.अर्थ-८
१६) नियोजन विभाग (का.१४७१), मंत्रालय, मुंबई
१७ (कार्यासन अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१८) निवड नस्ती (क्रीयुसे-१).